**प्रशासकीय मान्यता**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात राज्य योजनांतर्गत तसेच जिल्हा वार्षिक योजनांतर्गत उपलब्ध अनुदानातून संस्थेकरिता यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : जीसीजी-२०१८/प्र.क्र.२५९/प्रशा-१**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१,
दिनांक : २७ ऑगस्ट, २०१८.

**वाचा :**
१) शासन निर्णय,उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/ प्र.क्र. ८२/ भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/ शावैमगों/यंसाख/रा.यो व एकत्रित/८०९९/४-म/२०१८, दि. ०२.०८.२०१८.
५) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, गोंदिया यांचे क्रमांक जिनिस/संस-२/जिवायो/नाविन्य/प्रमावनिवि/१७-१८/५८३,दिनांक ३१.०३.२०१८.

**शासन निर्णय :-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया या संस्थेस संदर्भ क्रमांक ५ येथील पत्रान्वये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात जिल्हा वार्षिक योजनांतर्गत अनुदानातून यंत्रसामुग्री खरेदी करण्याकरीता रुपये ६५,९५,७७६/- (अक्षरी रुपये पासष्ट लक्ष पंचाण्णव हजार सातशे शहात्तर फक्त) इतके अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याकरिता मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. तसेच सदर संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात राज्य योजनांतर्गत अनुदानातून रुपये २.०० कोटी इतकी रक्कम यंत्रसामुग्री खरेदी करण्याकरिता मंजूर करण्यात आलेली आहे. सद्यस्थितीत संस्थेस रुपये २,६५,९५,७७६/- इतका निधी उपलब्ध आहे. सी. टी. स्कॅन मशीन १६ स्लाईसेस टर्न की सह ही यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी रुपये २३,९४,२२४/- इतक्या अतिरिक्त रकमेची आवश्यकता आहे. उपरोक्तनुसार राज्य योजनांतर्गत आणि

जिल्हा वार्षिक योजनांतर्गत अनुक्रमे रुपये २,२३,९४,२२४/ व रुपये ६५,९५,७७६/- इतक्या मंजूर अनुदानातून एकूण रुपये २,८९,९०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकोणनव्वद लक्ष नव्वद हजार फक्त) इतक्या रकमेची सी. टी. स्कॅन मशीन १६ स्लाईसेस टर्न की सह ही यंत्रसामुग्री खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रत्येकी किंमत (रुपये) | एकूण किंमत (रुपये) | प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | सी. टी. स्कॅन मशीन १६ स्लाईसेस टर्न की सह | ०१ | २,८९,९०,००० | २,८९,९०,००० | २,८९,९०,००० |
| | **एकूण** | | | २,८९,९०,००० | २,८९,९०,००० |

**अटी :-**

१) सदर प्रशासकीय मान्यता राज्य योजनांतर्गत तसेच जिल्हा वार्षिक योजनांतर्गत सदर संस्थेस यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी परिच्छेद क्रमांक २ मध्ये नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२) सदर यंत्रसामुग्री हाताळणी करण्यासाठी पदनिर्मितीची आवश्यकता नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा केलेली आहे.

३) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४) सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया “औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत” निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५) सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वै.शि.) यांनी करावी.

६) सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

७) प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८) मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९) सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर / उपलब्ध होणाऱ्या अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

**२.** या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद केल्यानुसार येणारा यंत्रनिहाय रुपये २,८९,९०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकोणनव्वद लक्ष नव्वद हजार फक्त) इतका खर्च सदर संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर झालेल्या राज्य योजनांतर्गत आणि जिल्हा वार्षिक योजनांतर्गत अनुक्रमे रुपये २,२३,९४,२२४/ व रुपये ६५,९५,७७६/- अनुदानातून भागविण्यात यावा व तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा -

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया

मागणी क्रमांक एस-४

४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३ - वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५ - विषम चिकित्सा
(००) - राज्य योजनांतर्गत योजना
(००) (३७) - शासकीय वैद्यक महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे
(४२१० १६२९)
५२ - यंत्रसामुग्री व साधनसामुग्री

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया

मागणी क्रमांक ओ-७२

| | | |
|---|---|---|
| ३४५१ | - | सचिवालयीन - आर्थिक सेवा |
| १०१ | - | नियोजन आयोग/ नियोजन मंडळ |
| १०५ | - | विषमचिकित्सा |
| (६०) | - | जिल्हा योजना- गोंदिया |
| (६०)(०२) | - | नाविण्यपूर्ण योजना (३४५१ १७३२) |
| ३१ | - | सहायक अनुदाने |
| २१ | - | पुरवठा व सामग्री |

**३.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२७१५१७१२२११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2018.08.27 15:30:17 +05'30'

( अ. मु. डहाळे )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स् कॉर्पोरेशन लि., मुंबई.
३. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, गोंदिया.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया.
७. निवडनस्ती (प्रशा-१).